# महाराष्ट्र शासन

क्रमांक : संकीर्ण०१२०/प्र.क्र.२९/१३-स
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
मंत्रालय विस्तार इमारत, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०००३२.
दिनांक : ३१ जानेवारी,२०२०.

## आदेश

ज्याअर्थी, राज्यातील नैसर्गिक आपत्तीग्रस्त, अवेळी पाऊसामुळे शेतीचे नुकसान झालेले शेतकरी, बँकांकडून घेतलेल्या कर्जाची परतफेड करू शकले नाहीत. परिणामी शेतकरी थकबाकीदार झाले व त्यांना शेती उत्पादनासाठी नव्याने पीक कर्ज घेण्यात अडचणी निर्माण झाल्या. या पार्श्वभुमीवर राज्य शासनाने दिनांक २७.१२.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये “महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९” घोषित करून पीक कर्ज/ पुनर्गठीत/ फेर पुनर्गठीत कर्ज खात्यामधील दिनांक ३०.०९.२०१९ रोजी मुद्दल व व्याजासह थकीत असलेली व परतफेड न झालेली रक्कम रुपये २.०० लाखापर्यंत असल्यास अशा कर्ज खात्यांना कर्जमुक्तीचा लाभ देण्याबाबत निर्णय घेण्यात आला असणे;

ज्याअर्थी, कर्जमुक्ती योजनेची तात्काळ अंमलबजावणी करण्यासाठी पोर्टलवर माहिती अपलोड करणे, बँकांना शेतकऱ्यांची यादी उपलब्ध करून देणे, शेतकऱ्यांच्या यादीची प्रसिद्धी, कर्ज खातेदारांचे आधार प्रमाणिकरण, जिल्हास्तरीय समितीमार्फत तक्रार निवारण इ. कार्यवाही यापुढील टप्प्यामध्ये मोहिम स्वरूपात करावी लागणार आहे. सदर योजनेचा हेतू थकबाकीदार शेतकऱ्यांना कर्जमुक्ती देऊन पुढील खरीप हंगामासाठी कर्ज घेण्यासाठी पात्र करणे असा आहे. त्यामुळे, पुढील हंगामापुर्वी शेतकऱ्यांना कर्जमुक्ती देण्याची कार्यवाही पूर्ण करावी लागणार असल्याने, सहकार विभागाचे जिल्हास्तरीय क्षेत्रिय अधिकारी तसेच, जिल्हाधिकारी व त्यांचे क्षेत्रिय अधिकारी यांचा सक्रिय सहभाग अपेक्षित असून सदर कर्जमाफीच्या कामाचे प्राधान्य विचारात घेऊन सहकर विभागातील बहुतांश अधिकारी योजनेच्या अंमलबजावणीमध्ये व्यस्त असणे;

ज्याअर्थी, राज्यातील निवडणूकीस पात्र असणा-या “अ”, “ब”, “क” व “ड” या प्रर्वगातील एकूण २२,६८० इतक्या सहकारी संस्थांची सदर संख्या विचारात घेता त्यांच्या निवडणुका घेण्यासाठी मोठ्या प्रमाणात प्रशिक्षित मनुष्यबळाची आवश्यकता आहे. मात्र महात्मा जोतिराव फुले शेतकरी कर्जमुक्ती योजना २०१९ या योजनेच्या अंमलबजावणीमध्ये सहकार विभागाचे क्षेत्रिय अधिकारी व्यस्त राहणार आहेत. यास्तव, सहकारी संस्थांच्या व्यवस्थापन समितीच्या निवडणुका मनुष्यबळाच्या अभावी पार पाडणे शक्य नाही;

ज्याअर्थी, २५० पर्यंत किंवा कमी सदस्य संख्या असलेल्या गृहनिर्माण सहकारी संस्था, यांच्या निवडणुका दि.२९/०२/२०२० पर्यंत पुढे ढकलण्यात आल्या आहेत. तसेच जिल्हा सहकारी मध्यवर्ती बँका व प्राथमिक कृषी सहकारी संस्था या सहकारी संस्थांच्या निवडणूका दि.२७/०१/२०२० रोजीच्या आदेशान्वये पुढील तीन महिने कालावधीकरिता पुढे ढकलण्यात आलेल्या आहेत.

त्याअर्थी, २५० पर्यंत किंवा कमी सदस्य संख्या असलेल्या गृहनिर्माण सहकारी संस्था, जिल्हा सहकारी मध्यवर्ती बँका, प्राथमिक कृषी सहकारी संस्था तसेच ज्या प्रकरणी मा. उच्च / सर्वोच्च न्यायालयाने निवडणूक घेण्याचे आदेशित केले आहे, आणि ज्या संस्थांच्या निवडणूक प्रक्रियेत नामनिर्देशन पत्र स्वीकारणे सुरु झालेले आहे, अशा संस्था वगळून महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० चे कलम १५७ मधील तरतुदीनुसार शासनास असलेल्या अधिकारात कलम ७३कक मधील तरतुदीस सुट देवून राज्यातील सहकारी संस्थांच्या व्यवस्थापन समितीच्या निवडणूका या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्यापर्यत पुढे ढकलण्यात येत आहेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१३११६२४४८५७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Chaudhary Anil Jayaram

Digitally signed by Chaudhary Anil Jayaram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co- Operation Marketing and Textile, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f26cf80358fa3133e4d85ddac30ae54b06c63743fd5510dc0ebca082b6c483ce, cn=Chaudhary Anil Jayaram
Date: 2020.01.31 16:04:32 +05'30'

**( अनिल ज. चौधरी )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे.
२. जिल्हाधिकारी (सर्व)
३. सचिव, राज्य सहकारी निवडणुक प्राधिकरण, पुणे.
४. विभागीय सहनिबंधक/उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व)
५. निवडनस्ती, कार्यासन १३-स